**उपसचिव हे पद सह सचिव या पदात श्रेणीवाढ व रुपांतरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः इएसटी-१११७/ प्र. क्र. ९१/ प्रशा-२**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : १३ एप्रिल, २०१७

**वाचा :- १) सामान्य प्रशासन विभाग आदेश क्र. ससप-१११६/प्र. क्र.२९६/ का-१४, दि.०१.०३.२०१७**

## शासन निर्णय

सामान्य प्रशासन विभागाचे आदेश क्रमांक ससप-१११६/प्र.क्र.२९६/का-१४, दि.०१.०३.२०१७ अन्वये श्री. सं. द. सूर्यवंशी, उप सचिव यांना सह सचिव पदावर तदर्थ पदोन्नती देऊन त्यांची पदस्थापना सार्वजनिक बांधकाम विभागात दर्शविली आहे. श्री. सं. द. सूर्यवंशी यांची दि.०१.०३.२०१७ (म. पू.) पासून सार्वजनिक बांधकाम विभागात सह सचिव पदावर पदस्थापना करण्यात आली आहे. सबब या विभागातील उप सचिव (वेतनसंरचना पीबी-३, रुपये १५६००-३९१०० व ग्रेड वेतन रु. ७६००/-) संवर्गातील एक स्थायी पद सहसचिव दर्जाच्या (वेतनसंरचना वेतन बँड पीबी-४, रुपये ३७४००-६७००० व ग्रेड वेतन रु.८७००/-) पदामध्ये दि.०१.०३.२०१७ (म.पू.) पासून तात्पुरत्या स्वरुपात श्रेणीवाढ व रुपांतरित करण्यात येत आहे.

२. उपरोक्त श्रेणीवाढ व रुपांतरीत केलेले पद हे श्री. सं.द. सूर्यवंशी, सह सचिव हे त्या पदावर असेपर्यंत अस्तित्वात राहील. त्यानंतर सदर पद आपोआप मूळ पदात रुपांतरित व श्रेणी अवनत होईल.

३. सदर पदावर होणारा खर्च मागणी क्रमांक “ एच-९, (सं. क्र.३४५१०२६२)३४५१-सचिवालय आर्थिक सेवा-०९०-सचिवालय- सार्वजनिक बांधकाम विभाग (खुद्द) (एक) वेतन ” या लेखाशीर्षाखाली खर्ची घालण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७४/२०१७ सेवा-९, दि.१०.०३.२०१७ अनुसार वित्त विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१३१२०२१३५३१८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mridula Sanjeev Deshpande

Digitally signed by Mridula Sanjeev Deshpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Mridula Sanjeev Deshpande
Date: 2017.04.13 12:05:26 +05'30'

**( मृ. सं. देशपांडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत

१) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखपाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपुर.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५) वित्त विभाग (सेवा-९),मंत्रालय, मुंबई.
६) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव, यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई.
८) सचिव (बांधकामे/रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई.
९) श्री. सं. द. सूर्यवंशी, सह सचिव , सार्वजनिक बांधकाम विभाग.
१०) रोखशाखा (२ जादा प्रतीसह), सार्वजनिक बांधकाम विभाग.
११) कार्यासन प्रशा- २, प्रशा - ३ नोंदणी शाखा, संगणक कक्ष सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई.